**स्व. भाऊसाहेब फुंडकर फळबाग लागवड योजनेंतर्गत सन २०२१-२२ मध्ये प्रलंबित दायित्वापोटी सर्वसाधारण प्रवर्गाचा रु. ३७५३.१८ लाख एवढा निधी अर्थसंकल्पिय वितरण प्रणालीवर उपलब्ध करुन देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्र. फुंफला-२०२१/प्र.क्र.९२/९-अे,**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई ४०० ०३२,
दिनांक : ०६ डिसेंबर, २०२१

**संदर्भ**:-

१) कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय, क्र. राफयो-२०१८/प्र.क्र. ४७/९-अे, दि. ६.७.२०१८
२) संचालक (फलोत्पादन), कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्याकडून प्राप्त झालेले जा.क्र. कृआ/फलो-२/भा.फुंडकर योजना/२०२१-२२/२४१५८/२१, दिनांक २८ जुलै, २०२१ चे पत्र.
३) संचालक (फलोत्पादन), कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्याकडून प्राप्त झालेले जा.क्र. कृआ/फलो-२/भा.फुंडकर योजना/२१-२२/२७७५५/२१, दिनांक २५ ऑगस्ट, २०२१ चे पत्र.
४) संचालक (फलोत्पादन), कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्याकडून प्राप्त झालेले जा.क्र. कृआ/फलो-२/भा.फुंडकर योजना/२०२१-२२/३०९१४/२१, दिनांक २१ सप्टेंबर, २०२१ चे पत्र.

**प्रस्तावना :-**

महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजनेंतर्गत जे शेतकरी फळबाग लागवडीकरिता पात्र ठरु शकत नाहीत अशा शेतकऱ्यांसाठी राज्य शासनाने उपरोक्त संदर्भ क्रमांक १ येथील शासन निर्णयान्वये स्व. भाऊसाहेब फुंडकर फळबाग लागवड योजना सुरु केली आहे. संदर्भ क्रमांक २, ३ व ४ येथील पत्रांन्वये आयुक्त (कृषि), कृषी आयुक्तालय, पुणे यांनी सदर योजनेची सन २०२१-२२ मध्ये अंमलबजावणी करण्यासाठी तीनही प्रवर्गापोटी प्रलंबित दायित्वाच्या रु. ३८३१.६२ लाख निधीच्या कार्यक्रमास प्रशासकीय मान्यता मिळावी अशी विनंती केली आहे. स्व. भाऊसाहेब फुंडकर फळबाग लागवड योजनेसाठी सन २०२१-२२ मध्ये अंमलबजावणी करण्याकरिता सर्वसाधारण प्रवर्गासाठी एकूण रु. १००.०० कोटी एवढया निधीची तरतुद करण्यात आली आहे. सन २०२१-२२ मध्ये स्व. भाऊसाहेब फुंडकर फळबाग लागवड योजनेअंतर्गत सर्वसाधारण प्रवर्गाच्या प्रलंबित दायित्वापोटी रु. ३७५३.१८ लाख निधी वितरणास वित्त विभागाने सहमती दर्शविली आहे. सदर निधी कृषि आयुक्तालयास वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्याबाबत शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय:-**

१) राज्यात स्व. भाऊसाहेब फुंडकर फळबाग लागवड या योनजेची सन २०२१-२२ मध्ये अंमलबजावणी करण्यासाठी सर्वसाधारण प्रवर्गाच्या प्रलंबित दायित्वापोटी रु. ३७५३.१८ लाख (रुपये सदोतीस कोटी त्रेपन्न लाख अठरा हजार फक्त) निधी आयुक्त (कृषि) यांना अर्थसंकल्पिय वितरण प्रणालीवर उपलब्ध करुन देण्यात येत आहे.

२) सदरचा निधी खालील लेखाशीर्षांतर्गत चालू वर्षी अर्थसंकल्पित केलेल्या तरतुदीतून खर्ची टाकावा.

मागणी क्र. डी-३
२४०१- पिक संवर्धन
११९, बागायती व भाजीपाला पिके,
(०१) फळे (३३), भाऊसाहेब फुंडकर फळबाग लागवड योजना,
३३-अर्थसहाय्य, (२४०१ A८८९)

३) या शासन निर्णयाद्वारे वितरित करण्यात आलेल्या रु. ३७५३.१८ लक्ष रक्कमेचे कोषागारातून आहरण व वितरण करण्याकरिता सहायक संचालक (लेखा-१), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत असून आयुक्त (कृषि), महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४) चालू वर्षी या योजनेंतर्गत उपलब्ध करुन दिलेला निधी सन २०१८-१९ व २०१९-२० या वर्षातील प्रलंबित दायित्वाच्या अदागयीसाठी वापरण्यात यावा.

५) सदर योजनेची संदर्भ क्रमांक १ येथे नमूद केलेल्या शासन निर्णयातील तरतुदी तसेच वेळोवेळी केलेल्या सुधारणाच्या अनुषंगाने अंमलबजावणी करावी.

६) संचालक (फलोत्पादन) यांनी सदर योजनेच्या अंमलबजावणीबाबतचा आढावा वेळोवेळी घ्यावा व त्याबाबतचा अहवाल वेळोवेळी आयुक्त (कृषी) यांचेमार्फत शासनास सादर करावा.

७) सदर योजनेंतर्गत निधी खर्च करताना महाराष्ट्र अर्थसंकल्प नियम पुस्तिका व वित्तीय अधिकार नियम पुस्तिकेमध्ये उल्लेख केलेल्या तसेच नियोजन व वित्त विभागाने निर्गमित केलेल्या मार्गदर्शक सूचना, प्रचलित अटी व शर्ती वेळोवेळी दिलेल्या सूचनांचे काटेकोरपणे पालन करावे.

८) सदर शासन निर्णय नियोजन विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्रमांक ३१४/१४३१, दि. ०७.१०.२०२१ अन्वये व वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्रमांक २९९/२०२१/व्यय-१, दि. १८.११.२०२१ अन्वये त्या विभागांनी दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०२११२०६१२१५४०७३०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by Hemant Gorakhnath Mhapankar
Date: 2021.12.06 12:17:11 +05'30'

**( हे. गो. म्हापणकर )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई.
२) मा. मंत्री (फलोत्पादन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
३) मा. राज्यमंत्री (फलोत्पादन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
४) मा. विरोधीपक्षनेते, महाराष्ट्र विधानपरिषद/महाराष्ट्र विधानसभा, विधानमंडळ सचिवालय, मुंबई-४०० ०३२.

५) सर्व सन्मानीय विधानपरिषद/विधानसभा सदस्य, महाराष्ट्र राज्य.
६) मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
७) अपर मुख्य सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
८) अपर मुख्य सचिव (वित्त) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
९) सचिव, (कृषी) कृषी व पदुम विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई -४०० ०३२.
१०) आयुक्त (कृषी), कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य,पुणे.
११) संचालक (फलोत्पादन), कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
१२) सर्व विभागीय कृषी सहसंचालक, महाराष्ट्र राज्य.
१३) सर्व जिल्हा अधीक्षक कृषी अधिकारी/तालुका कृषी अधिकारी, महाराष्ट्र राज्य.
१४) सहाय्यक संचालक (लेखा-१) कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
१५) महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता ) (लेखा परीक्षा ) मुंबई /नागपूर,
१६) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
१७) संचालक, लेखा व कोषागार, मुंबई.
१८) संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई.
१९) सहसंचालक लेखा व कोषागारे संगणक कक्ष, नवीन प्रशासन भवन, ५वा मजला, मुंबई -४०० ०३२.
२०) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी, महाराष्ट्र राज्य.
२१) कक्ष अधिकारी (२-अे), कृषी व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
२२) निवड नस्ती/९-अे.